**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः एएससी-१६२०/प्र.क्र.७९/१४-अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

तारीख: ३१ ऑगस्ट, २०२०

## शासन आदेश

बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील लिपिक-टंकलेखक (गट-क) (सेवा प्रवेश) नियम २०१८ दिनांक २१ फेब्रुवारी, २०१८ व बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील लिपिक-टंकलेखक (गट-क) (सेवा प्रवेश) (सुधारणा) नियम २०२० दिनांक २३ जानेवारी, २०२० अनुसार कलम ३ मधील अटींची पूर्तता करणाऱ्या मंत्रालयीन विभागातील खालील गट-ड संवर्गामधील कर्मचाऱ्यांना सन २०१९-२०२० च्या तदर्थ निवडसूचीतून लिपिक-टंकलेखक (गट-क अराजपत्रित वेतन स्तर एस-६ - १९९००-६३२००) पदावर या आदेशाव्दारे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्याच्या नावासमोर दर्शविलेल्या विभागात करण्यात येत आहे.

| अ. क्र. | श्री / श्रीमती | कर्मचाऱ्याचे नाव | कर्मचाऱ्याचा प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री | प्र.म.मकवाना | अजा | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |
| २ | श्रीमती | प्र.वा.पिंपळे | खुला | अल्पसंख्याक विकास विभाग | महसूल व वन विभाग |
| ३ | श्रीमती | ज.जि.मांगेला | विमाप्र | अल्पसंख्याक विकास विभाग | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| ४ | श्री | प्र.चं.सकपाळ | अजा | अल्पसंख्याक विकास विभाग | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| ५ | श्री | प्र.र.राठोड | विजा(अ) | अल्पसंख्याक विकास विभाग | नगर विकास विभाग |
| ६ | श्री | हे.य.सावंत | खुला | इतर मागास बहुजन कल्याण विभाग | इतर मागास बहुजन कल्याण विभाग |

२. उपरोक्त पदोन्नत्या मा.सर्वोच्च न्यायालयात प्रलंबित विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ च्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खुला प्रवर्गात रिक्त असलेल्या पदांवर ज्येष्ठतेने देण्यात येत आहेत.

३. मागास प्रवर्गातील कर्मचाऱ्यांची निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती ही शासन निर्णय दिनांक २५.०५.२००४ मधील तरतूदीनुसार त्यांना आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत या अटीच्या अधीन राहून करण्यात येत आहे. संबंधित विभागाने याची खातरजमा करावी.

४. या आदेशान्वये पदोन्नत होणाऱ्या उपरोक्त एकूण ६ कर्मचाऱ्यांविरुध्द कोणतीही विभागीय चौकशी सुरु नसल्याचे विभागाने कळविले आहे. तथापि, विभागांनी सदर कर्मचाऱ्यांना लिपिक-टंकलेखक पदावर पदस्थापना देण्यापूर्वी विभागीय चौकशीबाबत खातरजमा करावी.

५. श्री.प्र.म.मकवाना यांनी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९ दिनांक १९-०३-२००३, तसेच शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही २०१७/प्र.क्र. ४६२/कार्या-१२, दिनांक २८ मे, २०१८ व सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र.आरटीआर १४०३/८४/प्र.क्र.५४/०३/१३, दिनांक १० मे, २००५ मधील तरतुदीनुसार संगणक अर्हता (MSCIT) प्राप्त केल्याचे प्रमाणपत्र या आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत सादर करणे आवश्यक आहे.

६. संबंधित गट-ड मधील कर्मचारी यांनी लिपिक-टंकलेखक पदावरील निव्वळ तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नती न स्वीकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/कार्यासन-१२, दिनांक १२-०९-२०१६ अन्वये त्यांचे नाव सन २०१९-२०२० च्या तात्पुरत्या सुधारित निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल व पुढील २ वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत लिपिक-टंकलेखक पदावरील पदोन्नतीची पात्रता तपासण्यात येईल.

७. हे आदेश तत्काळ अंमलात येतील, गट-ड मधून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात लिपिक-टंकलेखक पदावर अन्य विभागात पदोन्नती देण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना संबंधित विभागाने तत्काळ कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच गट-ड मधून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नती देण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांनी पदस्थापना केलेल्या विभागात तत्काळ रुजू व्हावे.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक सांकेतांक** २०२००८३११५५८४७३४०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.08.31 15:59:57 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, (संबंधित विभाग)(विभागामार्फत)
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय
४. सह सचिव / उप सचिव (आस्थापना), (संबंधित विभाग)
५. संबंधित कर्मचारी (विभागामार्फत)
६. निवडनस्ती / कार्यासन १४-अ संग्रहार्थ.